विभागातील गट ड संवर्गातील मंजूर असलेल्या पदांपैकी
२५ % पदे निरसित करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक : इएसटी १०१८/प्र.क्र. २२६ / आस्था-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१८.

वाचा :

१) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक : इएसटी१००३ /(९१/२००३)/आस्था-१, दिनांक ०९ फेब्रुवारी, २००५.
२) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक : इएसटी ४४१५/प्र.क्र.३५४/आस्था-१, दिनांक १९ सप्टेंबर,२०१५.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : संकीर्ण २०१५/प्र.क्र.५७/२०१५/ विसु.-१, दिनांक १४ जानेवारी, २०१६.

शासन निर्णय :-

संदर्भाधीन क्रमांक-१ येथील दिनांक ०९ फेब्रुवारी, २००५ रोजीच्या शासन निर्णयान्वये या विभागातील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार विभागाच्या आस्थापनेवर गट ड मधील शिपाई संवर्गात सरळसेवेची १३ मंजूर पदे आहेत. तसेच गट ड मधील पदोन्नतीच्या विविध संवर्गात एकूण ७ पदे मंजूर आहेत. तद्नंतर संदर्भाधीन क्रमांक -२ येथील दिनांक १९ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये या विभागाच्या आस्थापनेवरील गट ड संवर्गातील २ शिपायांच्या सेवा कौशल्य विकास व उद्योजकता विभागास वर्ग करण्यात आल्या आहेत. त्यामुळे सद्यस्थितीत या विभागाच्या आस्थापनेवर शिपाई संवर्गातील सरळसेवेची ११ मंजूर पदे आहेत. गट ड संवर्गातील मंजूर असलेल्या पदांपैकी २५ % पदे निरसित करण्याचे निर्देश संदर्भाधीन क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आले आहेत.

२. आस्थापनेवरील मंजूर असलेल्या गट- ड मधील शिपाई संवर्गातील ११ मंजूर पदांपैकी २५% म्हणजेच ३ पदे व पदोन्नतीच्या सवंर्गातील ७ मंजूर पदांपैकी २५% म्हणजेच २ पदे निरसित करणे आवश्यक आहे. त्यानुसार गट ड मधील शिपाई संवर्गातील रिक्त असलेली सरळसेवेची ३ पदे व पदोन्नतीची २ पदे ( पॅकर-कम-वाईडर व रोनिओ चालक) निरसित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८३११२०४४४२२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Anushree Anil Salvi
Date: 2018.08.31 12:06:29 +05'30'

**(अनुश्री साळवी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री/ राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव.

२) अ.मु.स.(वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

८) सर्व सह/उप/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९) कक्ष अधिकारी(रोख शाखा/नोंदणी शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) निवडनस्ती, आस्था-१